**<u>आस्थापना - अमरावती विभाग</u>**

**उपविभागीय अधिकारी, कारंजा कार्यालयातील १० अस्थायी पदांना दिनांक १ ऑक्टोबर, २०१६ ते दिनांक २८ फेब्रुवारी, २०१७ या कालावधीपर्यंत मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

शासन निर्णय क्रमांकः ईएसटी- २०१६/प्र.क्र. ५१/ई-८

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : ०१ डिसेंबर, २०१६

<u>संदर्भ:-</u>

१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक: संकिर्ण १००२/प्र.क्र. ६६(भाग-२)/ ई-८, दिनांक २०/०३/२००६.

२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक: प्राफेब-२०१०/प्र.क्र. २६/पुनर्बांधणी-३/म-१०, दिनांक ३०/७/२०१३.

३) शासन निर्णय, वित्त विभाग क्र. पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/विसु-१, दिनांक ११/०२/२०१६.

४) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक: पदनि-२०१५/प्र.क्र. ०३/ई-८, दिनांक २३/०५/२०१६.

५) शासन निर्णय, वित्त विभाग क्र. पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/वित्तीय सुधारणा-१, दिनांक २१/०९/२०१६.

६) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक: ईएसटी-२०१६/प्र.क्र. ५१/ई-८, दिनांक १७/१०/२०१६.

७) विभागीय आयुक्त, अमरावती विभाग, अमरावती यांचे पत्र क्र. आकाअ/म.शा.३ /प्र.क्र. ९.२.२०१६, दिनांक ०७/१०/२०१६.

<u>प्रस्तावना:-</u>

वित्त विभागाच्या क्र. पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/वित्तीय सुधारणा-१, दि. २१ सप्टेंबर, २०१६ च्या शासन निर्णयान्वये सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु ज्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दि. ०१/१०/२०१६ ते दि. २८/०२/२०१७ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आले आहेत. त्यास अनुसरुन अमरावती विभागातील विभागीय आयुक्त, अमरावती विभाग, अमरावती तसेच जिल्हाधिकारी,

अमरावती, बुलढाणा, अकोला, वाशिम, यवतमाळ व त्यांच्या अधिपत्याखालील उप विभागीय अधिकारी, तहसिलदार व मंडळ अधिकारी या क्षेत्रिय कार्यालयांच्या आस्थापनेवरील आकृतीबंधातील १३५८ अस्थायी पदांना दि. ०१/१०/२०१६ ते दि. २८/०२/२०१७ या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यात आली आहे. या व्यतिरिक्त संदर्भाधीन क्र. ५ येथील दि. २३/०५/२०१६ अन्वये वाशिम जिल्ह्यातील उपविभागीय अधिकारी, कारंजा या कार्यालयासाठी १० अस्थायी पदे निर्माण करण्यात आली असून सदरहू अस्थायी पदांना प्रथमत: दि. ३०/०९/२०१६ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती. सदर मुदतवाढीची मुदत संपुष्टात आल्याने वित्त विभागाच्या उक्त दि.२१/०९/२०१६ च्या शासन निर्णयाच्या अनुषंगाने उपविभागीय अधिकारी, कारंजा या कार्यालयातील १० अस्थायी पदांना दि. ०१/१०/२०१६ ते दि.२८/०२/२०१७ या कालावधीसाठी बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

उपविभागीय अधिकारी, कारंजा या कार्यालयासाठी संदर्भाधीन क्र. ५ येथील दि. २३/०५/२०१६ अन्वये निर्माण केलेल्या खालील १० अस्थायी पदांना दिनांक ०१/१०/२०१६ ते दिनांक २८/०२/२०१७ या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | कार्यालयाचे नांव | पदनाम | एकूण अस्थायी पदे | लेखाशिर्ष<br>मागणी क्र. सी-१<br>२०५३ जिल्हा प्रशासन |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| | उप विभागीय अधिकारी कार्यालय, कारंजा, | उपविभागीय अधिकारी | १ | (००)(०९४) इतर आस्थापना<br>(०१) उप विभगीय आस्थापना<br>(०१)(०४) आयुक्त अमरावती<br>(२०५३ ०१९१)<br>०१- वेतन |
| | | नायब तहसीलदार | १ | |
| | | लघुलेखक (निम्न श्रेणी) | १ | |
| | | अव्वल कारकून | २ | |
| | | लिपिक टंकलेखक | २ | |
| | | वाहन चालक | १ | |
| | | शिपाई | २ | |
| **एकूण** | | | **१०** | |

२. सदर अस्थायी पदांवर होणारा खर्च परिच्छेद क्र. १ मधे दर्शविलेल्या तक्त्यातील रकाना- क्र. ५ मध्ये दर्शविलेल्या लेखाशिर्षाखालील सन २०१६-१७ साठी मंजूर झालेल्या अर्थसंकल्पिय अनुदानातून भागविण्यात यावा.

३. वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि. २१/०९/२०१६ च्या शासन निर्णयात सुधारीत आकृतीबंध मंजूर करण्यास दि. ३१/१२/२०१६ पर्यंत मुदतवाढ दिली असली तरी महाराष्ट्र विधानमंडळाचा हिवाळी

अधिवेशनाचा नियत कालावधी विचारात घेता या प्रस्तावांवर मंजूरी घेण्याकरीता आवश्यक ती कार्यवाही विनाविलंब करण्यात यावी, असे वित्त विभागाने निर्देशित केले आहे. त्यानुसार उक्त प्रकरणी उचित कार्यवाही करण्यात यावी.

४. सदर शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. पदनि २०१६/प्र. क्र.८/१६/वित्तीय सुधारणा-१ दिनांक २१ सप्टेंबर, २०१६ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०१६१२०११५४३२३७४१९ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Sambhaji C Mondkar

Digitally signed by Sambhaji C Mondkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=498986dde0d282daba86b0acfc9c21d4f9594cc3a6d64857d6a53c9b86d5509b, cn=Sambhaji C Mondkar
Date: 2016.12.01 15:48:59 +05'30'

**( सं. चं. मोंडकर )**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. विभागीय आयुक्त, अमरावती विभाग, अमरावती.
२. जिल्हाधिकारी, वाशिम.
३. उप विभागीय अधिकारी, कारंजा
४. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) -२, महाराष्ट्र, नागपूर.
५. प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा) -२, महाराष्ट्र, नागपूर.
६. जिल्हा कोषागार अधिकारी, वाशिम.
७. उप सचिव, कार्यासन व्यय-९/विसु-१, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
८.सह सचिव, कार्यासन ब-१, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
९.निवड नस्ती, कार्यासन ई-८, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.